# बगळा आणि बैल

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



ही एक विलक्षण गोष्ट आहे. यातील संवेदनशील काळी-पांढरी चित्रे अमेरिकी चित्रकार जॉन फुल्टनने काढली आहेत.

ही एका बगळ्याची आणि बैलाची हृदयस्पर्शी आणि स्फूर्तीदायक गोष्ट आहे. बैल एकदा बगळ्याचा जीव वाचवतो. मग काही वर्षांनंतर बगळा या उपकाराची परतफेड करतो. बगळा बैलाला इशारा देतो की त्याने बैलांच्या झुंजीत भाग घेतला तर तो जिवंत राहाणार नाही, तो खाटकाच्या दुकानात जाईल. शेवटी बैल झुंज करतो तेव्हा बगळा त्याला वाचवण्याची योजना आखतो.

मैत्री आणि निष्ठा या मूल्यांची ओळख करून देणारे पुस्तक.



फार फार वर्षांपूर्वी, दक्षिण स्पेनच्या विशाल दलदली भागानजिक एक छोटा बैल राहात असे. त्याला कशाचेही भय वाटत नसे. त्याच्या अंगावरचे केस काळेभोर आणि चमकदार होते. त्याचे डोळे गडद आणि सौम्य होते. पण राग आला की हेच डोळे गरम कोळशासारखे लालबुंद दिसत.

बैलाची शिंगे तशी लहानच होती, पण तरीही तो नेहमी हल्ल्याच्या तयारीत असे. शेवटी स्पॅनिश बैल जगातील सर्वात शूर बैल मानले जातात.



लहान बैल राहात होता तिथे जवळच एका बगळ्याचे घरटे होते. बगळ्यांच्या चेहऱ्यावर नेहमी गंभीर भाव असतात. ते रागीट वाटतात तेव्हा खरंतर ते आनंदी असतात. या पांढऱ्याशुभ्र पक्ष्यांना काळ्या बैलाच्या अंगावर चिकटलेल्या पिसवा खायला आवडतात.

एकदा बगळ्याच्या पिल्लाची आई घरटे सोडून गेली. तेव्हा एक कोल्हा घरट्यातील पिल्लाजवळ आला. तो पिल्लावर झेप घेणार इतक्यात तिथे छोटा बैल अवतरला.

“शरम वाटली पाहिजे तुला स्वत:ची,” छोटा बैल कोल्ह्यावर किंचाळला.

पण कोल्हा दात विचकून गुरगुरू लागला.





मग छोटा बैल आपले डोके झुकवत, शिंगे उगारत कोल्ह्यावर चालून गेला आणि त्याला दूर पिटाळले.

छोटा बैल घरट्याकडे परतला.

“तुझे आभार कसे मानायचे, कळत नाही!” बगळ्याचे पिल्लू म्हणाले.

छोटा बैल मंदपणे हसत उत्तरला, “तू मोठा झालास, उडू लागलास, तुझी चोच टोकदार झाली की तू माझ्या अंगावरच्या पिसवा खाऊ शकशील. तू बगळ्याचं पिल्लू आहेस म्हणून मी तुला *छोटा बगळा* म्हणत जाईन.”

“आणि मी तुला *टोरो* म्हणेन,” छोटा बगळा म्हणाला, “कारण स्पॅनिश भाषेत बैलाला टोरो म्हणतात.”

त्या दिवसापासून बैल आणि बगळा यांच्यात घनिष्ट मैत्री झाली.





काळ सरला आणि छोट्या बगळ्याचे पांढरेशुभ्र पंख मोठे झाले. तो आभाळात बाणासारखा सूर मारून उडू लागला.

टोरो बैलही मोठा आणि धिप्पाड झाला. त्याची शिंगे टोकदार झाली आणि चंद्राच्या कोरीसारखी दिसू लागली.



स्पेनच्या दक्षिण भागात कित्येक दिवस सतत मुसळधार पाऊस पडत राहातो तेव्हा छोटा बगळा टोरोच्या पायांखाली आसरा घेत असे.

तसेच स्पेनच्या दक्षिण भागात उन्हाळ्यात सूर्य अक्षरश: होरपळून काढतो तेव्हा छोटा बगळा तळ्यातून परतून, आपल्या पंखांची फडफड करून टोरोला गारवा देत असे.



छोट्या बगळ्याला सकाळी सकाळी खूप भूक लागत असे. त्यामुळे सकाळ होताच तो आपल्या मित्राला जागे करत असे. मग डोळ्यांवर अनावर झोप असली तरी टोरो आपले डोके उचलून एका कुशीवर ठेवत असे. त्यामुळे छोटा बगळा त्याच्या मोठ्या मानेवरच्या गुबगुबीत पिसवा निवडून खाऊ शकत असे.



नंतर टोरो कुरणात चरत असे. गवतात चालू लागल्यावर त्याच्या मोठ्या खुरांमुळे नाकतोडे आणि इतर किटक गवतातून बाहेर येऊन उडत. मग छोटा बगळा त्यांना चोचीत पकडून मजेत खात असे.



टोरो आपल्या कुरणाच्या बाहेर कधी गेला नाही. पण त्याला वाटे की त्याने सगळं जग पाहिले आहे. कारण रोज संध्याकाळच्या नीरव शांततेत छोटा बगळा परतून त्याला दिवसभर आपण कुठेकुठे गेलो, कायकाय बघितले याचे किस्से-कहाण्या ऐकवतो.

तो निळा सागर आणि त्यातील जहाजांबद्दल सांगतो.

टोरोपेक्षाही भव्य आकार असलेल्या जिब्राल्टरच्या खडकाबद्दल सांगतो आणि अगदी उत्तर आफ्रिकेत आढळणाऱ्या कुबड असलेल्या विचित्र ऊंटांबद्दलही सांगतो.



टोरोला इतर बैलांसोबत झुंज खेळण्यास आवडत असे. ते एकमेकांना ढुशी देऊन ढकलत असत. छोटा बगळा टोरोला फार काही मदत करू शकत नसे. पण टोरो नेहमी जिंकत असे. तो तेथील कुरणातील सर्वात धिप्पाड अंगाचा बळकट बैल होता.





टोरो आणि छोटा बगळा सोबत चालत तेव्हा सगळे बैल त्यांचे कौतुक करत.

एकदा घोड्यावर स्वार होऊन काही लोक कुरणात आले. ते झुंजीसाठी बलवान बैल शोधत होते. ते टोरोला दंडुक्याने मारून, त्याला पळायला लावून त्याची कसोटी पाहू लागले तेव्हा छोट्या बगळ्याने आकाशातून त्यांच्या डोक्यावर झेपावून त्यांच्या टोप्या जमिनीवर पाडल्या.

पण तोवर घोडेस्वारांना खात्री पटली होती की टोरो हा स्पेनचा सर्वात धीट आणि बळकट बैल आहे.



एकदा दुपारी छोटा बगळा बराच वेळ आभाळात उडून परतला तेव्हा टोरो एका सुकलेल्या झाडाच्या खोडाला आपले शिंग गर्वाने रगडत होता.

टोरो खूप उत्तेजित होता.

“ते घोडेस्वार आले होते आज इथे. पुढच्या रविवारी झुंज आहे, त्यात सर्वात शूर बैल म्हणून माझी निवड केली त्यांनी,” तो मोठ्याने ओरडला.





“पण टोरो झुंज जिंकल्यावर तू जिवंत परत येऊ शकणार नाहीस,” छोटा बगळा रडत म्हणाला. “झुंजीच्या आखाड्यात उतरलेले बैल खाटकाच्या तलवारीचे शिकार ठरतात.”

“काळजी करू नकोस, मित्रा,” टोरो म्हणाला. “त्यांनी माझ्याइतका शूर, ताकदवान बैल कुठे पाहिला नसेल आजवर. कुणी मला तलवारीने मारणार नाही.”

हे ऐकून छोट्या बगळ्याला गहिवरून आले आणि त्याचे इवलेइवले पिवळे डोळे अश्रुंनी डबडबले, कारण त्याला खरी परिस्थिती माहीत होती. खरंतर, छोटा बगळा कित्येकदा रविवारी दुपारी झुंज बघायला जात असे. झुंजीतील कुणी बैल आजवर जिवंत परतला नव्हता, ही गोष्ट त्याने टोरोला कधी सांगितली नव्हती.

छोट्या बगळ्याने बरेच प्रयत्न केले तरी तो टोरोला समजावू शकला नाही की झुंज झाल्यावर सगळ्या बैलांचा शेवट खाटकाच्या दुकानात होतो. शेवटी धीर संपल्यावर आपले पाय आपटत, किंचाळत तो ओरडला, “तू एवढा कसा बथ्थड डोक्याचा आहेस!”



मग तो निर्णायक दिवस उगवला. ते घोडेस्वार आले आणि टोरोला मोठ्या पेटीत बंद करून घेऊन गेले.

छोटा बगळा त्या ट्रकच्या मागेमागे उडू लागला. त्याला एवढे दु:ख झाले की आपले हृदय भंगून जाईल की काय, असे त्याला वाटू लागले.





झुंजीच्या आखाड्याभोवती लोक दाटीवाटीने बसले होते.

तिथे एक वाद्यवृंद सुंदर संगीत वाजवत होता.

तेथील स्त्रियांनी काळ्या फिती लावलेले आकर्षक पेहराव घातले होते.

शेवटी आखाड्याच्या वृद्ध प्रमुखाने तुतारी वाजवण्याचा इशारा केला. बैलांशी लढणारे तलवारबहाद्दर सोनेरी वाळूवर ऐटीत चालू लागले.

मग एक मोठा लाकडी दरवाजा उघडण्यात आला आणि टोरोने आखाड्याच्या रिंगणात प्रवेश केला.



ही झुंज म्हणजे छोट्या बगळ्याच्या सहनशक्तीच्या पलिकडील दृश्य होते. तो आखाड्याच्या मागच्या भिंतीवर बसून मोठमोठ्याने हुंदके देऊ लागला.



“मी काय करू शकतो?” भिंतीवर मागेपुढे फिरत-फिरत तो विचार करू लागला.

जवळच असलेल्या एका समजूतदार वृद्ध बैलाने बगळ्याचे रडणे ऐकले. त्याने विचारले, “कशाने दु:खी झालायस, माझ्या पांढऱ्याशुभ्र पंखांच्या मित्रा?”

मग छोट्या बगळ्याने वृद्ध बैलाला टोरोबद्दल सांगितले.

“असं आहे तर!” वृद्ध बैल म्हणाला. “खरंच दु:खाची गोष्ट आहे. पण तुझा मित्र तर स्पेनमधला सर्वात शूर बैल आहे, म्हणालास ना तू? मग आशेचा एक किरण बाकी आहे. इथल्या लोकांना एवढ्या शूर बैलाच्या जीवाची पर्वा आणि किंमत नसेल, पण म्हाताऱ्या अधू दृष्टि असलेल्या आखाड्याच्या प्रमुखाला नक्कीच आहे.”





“पण मग करायचं काय?” टोरो आर्जव करत म्हणाला. “प्लीज, लवकर सांगा. टोरो आखाड्यात पोहोचलाय आता.”

“ठीकाय,” वृद्ध बैल म्हणाला, “मी वासरू होतो तेव्हा बैल शूर असेल तर सगळे लोक त्यांचा पांढरा रुमाल काढून हवेत फडफडवत. मग प्रमुख बैलाला पुन्हा कुरणात नेऊन सोडायचे आदेश देत. मग तो बैल पुन्हा पहिल्यासारखे शांत आयुष्य जगू शकत असे.”

“तुम्ही म्हणताय प्रमुखाची दृष्टी अधू आहे?” छोटा बगळा म्हणाला. क्षणभर विचार करून छोटा बगळा हवेत झेपावला.

छोटा बगळा झुंजीच्या आखाड्यावरून उडत जाऊ लागला तेव्हा टोरो तलवारबहाद्दराने हाती धरलेल्या कपड्याच्या रोखाने चाल करून जात होता.



छोटा बगळा आकाशात उंच उडाला आणि नदीपार दलदलीकडे जाऊ लागला.





तिथे अनेक बगळे शांतपणे काही खात होते किंवा उन्हात बसून अंगाला ऊब देत होते. छोटा बगळा त्यांच्याजवळ उतरला आणि मदतीसाठी कर्कश आवाजात आर्जव करू लागला.

छोट्या बगळ्याची हृदयद्रावक गोष्ट ऐकून बगळ्यांची झुंड पांढऱ्याशुभ्र ढगांसारखी आभाळात उडू लागली आणि छोट्या बगळ्याच्या मागेमागे आखाड्याच्या दिशेने जाऊ लागली.



इकडे आखाड्यात, भयभीत झालेला तलवारबहाद्दर त्याची धारदार तलवार म्यानातून बाहेर काढू लागला.

"मी आजवर बघितलेला हा सर्वात लढाऊ बैल आहे," वृद्ध प्रमुख म्हणाला.

तलवारबहाद्दराने आपली तलवार टोरोच्या दिशेने रोखताच, टोरोच्या लक्षात आले की छोटा बगळा खरं सांगत होता.





पांढऱ्या बगळ्यांची झुंड ढगांसारखा खाली आली आणि आखाड्याभोवती चक्कर मारू लागली.



आपल्या खुर्चीवर बसल्याबसल्या अधू दृष्टिच्या प्रमुखाला आखाड्यावर चक्कर मारणारे बगळे दिसले. तो ओरडला, “तुतारी वाजवा रे! मला माहीत होतं! माहीत होतं मला! शहरातल्या लोकांना बहादूर बैलाला वाचवण्याची युक्ती चांगलीच लक्षात आहे! बघा, कसे फडफडवतायत ते पांढरे रुमाल!”

आखाड्याभोवती बसलेले सगळे वृद्ध लोक, अधू दृष्टिच्या प्रमुखासारखेच, बगळ्याच्या झुंडीला फडफडते पांढरे रुमाल समजले.

“बैलाला वाचवा!” ते ओरडू लागले आणि स्वतःचे रुमाल हवेत फडफडवू लागले. संपूर्ण आखाड्यात पांढऱ्या रुमालांचा समुद्र दिसू लागला.

तुतारीवाल्यांनी शानदार सलामी देणारे संगीत वाजवले. वाद्यवृंदाने आधीपेक्षाही चांगली धुन वाजवली. लोकांच्या टाळ्यांनी आखाडा बराच वेळ दुमदुमत राहिला. मग मोठा लाकडी दरवाजा उघडला. टोरो गर्वाने रिंगण सोडून बाहेर आला आणि हळूहळू तबेल्याकडे परतू लागला.

मग छोट्या बगळ्याने ओरडून आपल्या दोस्त बगळ्यांचे आभार मानले. सगळे बगळे उडत पुन्हा दलदलीकडे गेले.





रिंगणाच्या मागे, टोरो रडत होता. तो छोट्या बगळ्याला म्हणाला, “मित्रा, तू बरोबर बोललास. तू आणि तुझी दोस्तमंडळी नसती तर मी कुठल्यातरी खाटकाच्या दुकानात लटकत असतो.”

“तू आता आराम कर,” आनंदाने म्हणत छोट्या बगळ्याने टोरोच्या अंगावरचा एक गुबगुबीत पिसू चोचीने खेचून बाहेर काढला.



पुढल्या दिवशी सकाळी, टोरोला पुन्हा त्याच्या कुरणात सोडण्यात आले. छोटा बगळा त्याची वाटच बघत होता. दोघे खूप आनंदात होते.

या गोष्टीला कित्येक वर्षे लोटली. पण आजही शहरातील लोक पांढऱ्या रुमालांची ती दुपार आठवून स्पेनच्या सर्वात शूर टोरो या बैलाच्या गप्पा मारतात.



समाप्त